राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान (RGPSA) योजनेखाली सन २०१४-१५ या वित्तीय वर्षाकरिता केंद्र शासनाकडून केंद्र हिश्श्याकरीता प्राप्त झालेला निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रागापं-२०१३/प्र.क्र. १९१/योजना-४**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,

फोर्ट,मुंबई- ४०० ०३२

तारीख: ९ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास विभाग क्र.रागांपं २०१२/प्र.९२/योजना-४,दि. ३ मार्च, २०१४.

२) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास विभाग क्र.रागांपं २०१४/प्र.१४८/योजना-४,दि.१ ऑगस्ट, २०१४.

३) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास विभाग क्र.रागांपं २०१३/प्र.१४०/योजना-४,दि. ६ ऑगस्ट, २०१४.

४) केंद्र शासनाच्या पंचायत राज मंत्रालयाकडील क्र. K.११०११/०७/२०१४-DPE दि. २४.०९.२०१४ ची सहा पत्रे.

**प्रस्तावना**

राज्य घटनेच्या ७३ व्या घटना दुरुस्तीनुसार जिल्हा व ग्राम पातळीवरील पंचायत राज संस्थाना वैधानिक दर्जा प्राप्त झाला आहे. केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेंतर्गत पंचायती राज व्यवस्थेच्या जबाबदा-या तसेच अधिकार सक्षमपणे पेलण्यासाठी व पंचायती राज व्यवस्थेच्या बळकटीकरणासाठी विविध कार्यक्रमांचे एकत्रिकरण करुन पंचायती राज व्यवस्थेच्या सशक्तीकरणाचा एक भाग म्हणून सर्वसमावेक्षक अशी राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान (RGPSA) ही ७५:२५ केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत योजना सुरु केली आहे. ही योजना राज्य शासनाने दिनांक ३ मार्च २०१४ च्या शासन निर्णयान्वये राज्यात लागू केली आहे.

राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान (RGPSA) या योजनेचा एकंदरीत पंचावार्षिक आराखडा रुपये ११०१.७१ कोटी ( केद्र हिस्सा रुपये ८२६.२८) व राज्य हिस्सा रुपये २७५.४३ कोटी) इतका तसेच सन २०१३-१४ या वर्षाचा वार्षिक आराखडा रुपये ३०५.२९ कोटीचा प्रस्ताव केंद्र शासनास सादर

करण्यात आला होता. केंद्र शासनाने पंचवार्षिक आराखडयास तसेच सन २०१३-१४ या वित्तीय वर्षाकरिता रुपये २२१.७८ कोटी इतक्या तरतूदीस मान्यता दिली. त्यापैकी रुपये ८३.१७ कोटी इतका निधि प्राप्त झाला. त्या पटीत राज्य हिस्स्याची रुपये १४.५० कोटी इतका निधि उपलब्ध करुन देण्यात आला. सदर निधी यशदा, पुणे यांच्या खात्यावर जमा करण्यात आला. त्याचप्रमाणे सन २०१४-१५ या वर्षाचा वार्षिक आराखडा रुपये २४१६०.७९ लक्षचा प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात आला होता. त्यापैकी केंद्र शासनाने रुपये २१४३१.४१ लक्ष इतक्या प्रस्तावास मान्यता दिली. यापैकी केंद्र हिस्सा रु. १६०७३.५६ लक्ष इतका आहे तर राज्य हिस्सा रु.५५३७.८५ लक्ष इतका आहे. या प्रस्तावापैकी केंद्र शासनाने ७५% हिश्श्यापैकी,

१) केंद्र शासनाच्या पंचायती राज मंत्रालयाचे क्रमांक K-११०११/०७/२०१४-DPE, दिनांक २४.०९.२०१४ च्या पत्रान्वये अनुसूचीत जाती प्रवर्गासाठी (SC) करिता रु.५,५६,१०,७२०/- ( रुपये पाच कोटी छपन्न लक्ष दहा हजार सातशे वीस फक्त ) तसेच अधिदान व लेखा अधिकारी यांचे पत्र क्र. पीएओ/पीआर/पीआरई-चेक/२०१४-१५-१६४८-१६५३ कोड नंबर ७९६/ॲडव्हाईज नंबर ३८२, दिनांक ३०/०९/२०१४

२) पत्र क्रमांक K-११०११/०७/२०१४-DPE, दिनांक २४.०९.२०१४ च्या पत्रान्वये अनुसूचीत जमाती प्रवर्गासाठी (ST) करिता रु. २,४३,२९,६९०/- (रुपये दोन कोटी त्रेचाळीस लक्ष एकोणतीस हजार सहाशे नव्वद फक्त) तसेच अधिदान व लेखा अधिकारी यांचे पत्र क्र.पीएओ/पीआर/पीआरई-चेक/२०१४-१५-१६५४-१६५९ कोड नंबर ७९६/ॲडव्हाईज नंबर ३८३, दिनांक ३०/०९/२०१४

३) पत्र क्रमांक K-११०११/०७/२०१४-DPE, दिनांक २४.०९.२०१४ च्या पत्रान्वये सर्व साधारण प्रवर्गासाठी (GEN) करिता रु. १९,८१,१३,१९०/- ( रुपये एकोणीस कोटी,एक्याऐंशी लाख,तेरा हजार एकशे नव्वद फक्त) तसेच अधिदान व लेखा अधिकारी यांचे पत्र क्र. पीएओ/पीआर/पीआरई-चेक/२०१४-१५-१६६०-१६६५ कोड नंबर ७९६/ॲडव्हाईज नंबर ३८४, दिनांक ३०/०९/२०१४

४) पत्र क्रमांक K-११०११/०७/२०१४-DPE, दिनांक २४.०९.२०१४ च्या पत्रान्वये अनुसूचीत जमाती प्रवर्गासाठी (SC) करिता रु. १,३९,०२,६८०/- ( रुपये एक कोटी एकोणचाळीस लक्ष दोन हजार सहाशे ऐंशी फक्त ) तसेच अधिदान व लेखा अधिकारी यांचे पत्र क्र.पीएओ/पीआर/पीआरई-चेक/२०१४-१५-१६६६-१६७१ कोड नंबर ७९६/ॲडव्हाईज नंबर ३८५, दिनांक ३०/०९/२०१४

५) पत्र क्रमांक K-११०११/०७/२०१४-DPE, दिनांक २४.०९.२०१४ च्या पत्रान्वये अनुसूचीत जमाती प्रवर्गासाठी (ST) करिता रुपये ६९,५१,३४०/- ( रुपये एकोणसत्तर लाख एकावन्न हजार तीनशे चाळीस फक्त) तसेच अधिदान व लेखा अधिकारी यांचे पत्र क्र.पीएओ/ पीआर/पीआरई-चेक/२०१४-१५-१६७१-१६७७ कोड नंबर ७९६/ॲडव्हाईज नंबर ३८६, दिनांक ३०/०९/२०१४ व

६) पत्र क्रमांक K-११०११/०७/२०१४-DPE, दिनांक २४.०९.२०१४ च्या पत्रान्वये सर्व साधारण प्रवर्गासाठी (GEN) करिता रुपये ४,८६,५९,३८०/- ( रुपये चार कोटी शहाऐंशी लक्ष एकोणसाठ हजार तीनशे ऐंशी फक्त) तसेच अधिदान व लेखा अधिकारी यांचे पत्र क्र.पीएओ/पीआर/पीआरई-चेक/२०१४-१५-१६७८-१६८३ कोड नंबर ७९६/ॲडव्हाईज नंबर ३८७, दिनांक ३०/०९/२०१४ असा

एकूण रु. ३४,७५,६७,०००/- ( रुपये चौतीस कोटी पंच्याहत्ता लक्ष सदुसष्ट हजार फक्त ) इतका निधी केंद्र शासनाच्या पंचायती राज मंत्रालयाकडून ७५% केंद्र हिस्स्यापोटी राज्य शासनास प्राप्त झालेला आहे.

उपरोक्त निधी B.D.S. वर उपलब्ध करुन राज्य प्रकल्प संचालक, राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान (RGPSA), पुणे यांना उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान (RGPSA) (७५:२५) या कार्यक्रमासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु. ३४,७५,६७,०००/- (रुपये चौतीस कोटी पंच्याहत्ता लक्ष सदुसष्ट हजार फक्त ) इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान (RGPSA) यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. राज्य प्रकल्प संचालक, राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान, राज्य व्यवस्थापन कक्ष, पुणे यांना वितरीत करावयाचा निधी विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. राज्य प्रकल्प संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पुणे यांना अनुदान वितरीत करण्यासाठी उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. त्यांनी संबंधित राज्य प्रकल्प संचालक यांना अनुदान वितरीत करावे.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च अत्यंत काटकसरीने केला जाईल याबाबत राज्य प्रकल्प संचालक, राज्य व्यवस्थापनक कक्ष, पुणे यांनी व सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. राज्य प्रकल्प संचालक, राज्य व्यवस्थापनक कक्ष, पुणे यांना या योजनेसाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार संबंधितांना वितरीत करावा आणि वितरीत केलेल्या निधीचा विनियोग योग्य प्रकारे होतो किंवा नाही, याबाबत खातजमा करुन घ्यावी. त्याचप्रमाणे होणाऱ्या खर्चावर नियंत्रण ठेवावे आणि निश्चित केलेली उद्दीष्टे, झालेली साध्ये यावरील झालेल्या खर्चाचा आढावा घेऊन शासनास तात्काळ अहवाल पाठवावा. तसेच खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र देखील सादर करावे.

४. या अनुदानातून राज्य प्रकल्प संचालक, राज्य व्यवस्थापनक कक्ष, पुणे यांनी केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासणीचे अधिकार महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई आणि महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित संस्था/कार्यालय त्यांना संपूर्ण मदत/सहकार्य करील.

५. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्र. एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन, ०९३-जिल्हा आस्थापना -राज्यक्षेत्र, ०६ पंच, सरपंच, सचिव,

अशासकिय सदस्य इत्यादिंना प्रशिक्षण (०६)(०४) राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान (केंद्र पुरस्कृत) (७५:२५) (योजनेंतर्गत) (केंद्र हिस्सा) (२०५३१३३८) ३१-सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये मंजूर असलेल्या तरतुदीतून निधी खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग १ ते ५ मधील तरतुदीनुसार शासन निर्णय दिनांक १५ मे, २००९ सोबतच्या उपविभाग ३ मधील अ.क्र. १ परि.१६२, १६३, १६४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन तसेच वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/ २०१५, अर्थसंकल्प-३, दिनांक २ जानेवारी, २०१५ आणि अनौपचारिक संदर्भ क्र. ६१/२०१५, व्यय-१५, दिनांक ४ फेब्रुवारी,२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०७१५४९२८४१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Bhagawan Bayaji Mahale

Digitally signed by Bhagawan Bayaji Mahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Bhagawan Bayaji Mahale
Date: 2015.02.10 13:20:32 +05'30'

**( भ. ब. महाले )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.मंत्री, मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
४. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,
५. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व),
६. मा.विधान सभा /मा.विधान परिषद सदस्य (सर्व),

७. मा. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव (नियोजन, वित्त, ग्राम विकास, जलसंधारण,आदिवासी विकास, सामाजिक न्याय, माहिती व तंत्रज्ञान) यांचे स्वीय सहायक,
८. विभागीय आयुक्त (सर्व)
९. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), बाणेर रोड, पुणे.
१०.राज्य प्रकल्प संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष, पुणे
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
१२.राज्य प्रकल्प संचालक, राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (RGPSA), पुणे,
१३.उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्रवि/ग्रामपंचायत), जिल्हा परिषद (सर्व)
१४. वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७), मंत्रालय, मुंबई-३२,
१५.उप सचिव (वित्त-१/ग्रा.वि.), मंत्रालय, मुंबई-३२,
१६.सह सचिव /उप सचिव सर्व, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई,
१८.कार्यासन- वित्त-१
१९. निवडनस्ती-योजना-४.